# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरूस्ती-१०१८/प्र.क्र.३९४/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०३ जानेवारी २०१९.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील नवीन पोलीस वसाहत, नायगांव, येथील "डी" ब्लॉक मधील इमारत क्र. ३३ ते ४४ मध्ये *"Providing SR to EI"* हे विद्युतविषयक दुरूस्तीचे काम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(१)/शा.२७५/२०१८, दिनांक १३.११.२०१८.

**ज्ञापन.-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाने नवीन पोलीस वसाहत, नायगांव, येथील "डी" ब्लॉक मधील इमारत क्र. ३३ ते ४४ मध्ये *"Providing SR to EI"* हे विद्युतविषयक दुरूस्तीचे काम करण्यासाठी रु.५,६३,१२६/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप अभियंता, दादर विद्युत (सा.बां.) उपविभाग, मुंबई, यांनी सन २०१७-१८ च्या दरसूचीनुसार तयार केलेले खर्चाचे अंदाज सादर केले असून ते कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत (सा.बां.) विभाग, मुंबई, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.५,४८,३००/-** असे सुधारित केले आहेत, आणि त्याप्रमाणे, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, नवीन पोलीस वसाहत, नायगांव, येथील "डी" ब्लॉक मधील इमारत क्र. ३३ ते ४४ मध्ये *"Providing SR to EI"* हे विद्युतविषयक दुरूस्तीचे काम करण्यासाठी **रु.५,४८,३००/-** *(रुपये पाच लक्ष, अठ्ठेचाळीस हजार, तीनशे फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.

२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५८१/१८/इमा.-२, दिनांक १७.१२.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०८११५३१८५८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.01.08 12:07:00 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत (सा.बां.) विभाग, मुंबई *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारित केलेल्या "Abstract" च्या प्रतीसह).*
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).